सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत गतिमान वैरण विकास कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कृविका २०१५ /प्र.क्र.१९८/३-अे**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२

**दिनांक : ३१ जुलै , २०१५**

<u>वाचा</u> : राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या २०व्या बैठकीचे इतिवृत्त-शासन पत्र क्र.RKV-०४१५/C.R.३८/RKVY CELL, Date.२५th June, २०१५.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) च्या मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दि. १८ जून, २०१५ च्या २० व्या बैठकीत चालू वर्षात माहे जून ते सप्टेंबर या कालावधीत राज्यात समाधानकारक पाऊस झाला नाही, तर चालू वित्तीय वर्षासाठी आकस्मिक परिस्थितीमध्ये गतिमान वैरण विकास कार्यक्रम राबविण्यात येईल असा निर्णय घेण्यात आला.

राज्यामध्ये आजअखेर पर्जन्यमानाची असमाधानकारक परिस्थिती पहाता आगामी काळात चारा टंचाई परिस्थितीवर मात करण्याच्या अनुषंगाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेतंर्गत राज्यात उद्भवलेल्या अवर्षणाच्या पार्श्वभूमीवर गतीमान वैरण विकास कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, तदनुषंगाने शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत गतीमान वैरण विकास कार्यक्रमाच्या अंमलबजावणी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे तसेच चालू वर्षाकरीता या योजनेस राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत रु. २५ कोटी (रुपये पंचवीस कोटी फक्त) निधी मंजूर करण्यात येत आहे.

२. सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत गतिमान वैरण विकास कार्यक्रम राबविण्यासाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना कार्यक्रमाचे कार्यान्वयन तसेच संनियंत्रण करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी प्रस्तुत योजना राबविण्याकरीता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांस अनुसरुन कृषि विभागाच्या कार्यालयीन पध्दतीत अंतर्भाव करावा. तसेच राज्यातील जिल्ह्यांना भौतिक व वित्तीय लक्षांक दयावा व आवश्यकतेनुसार मंजूर निधीचे वितरण करावे. सदर कार्यपध्दतीत पुढील बाबींचा समावेश करण्यात यावा -

अ. राज्यातील ज्या तालुक्यांमध्ये ३१ जुलै, २०१५ अखेर सरासरी पर्जन्यमानाच्या ५०% पेक्षा कमी पाऊस झाला असेल त्या तालुक्यांमध्ये गतिमान वैरण विकास कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यात यावी. ( सोबत यादी जोडली आहे )

**आ.** अनुक्रमांक (अ) येथील निकषानुसार विदर्भ व मराठवाडयातील अवर्षण परिस्थिती उद्भवलेल्या जिल्हयांमध्ये / संबंधित तालुक्यांमध्ये उपलब्ध असलेल्या पशुधनाची संख्या विचारात घेऊन चारा उत्पादन घेता येवू शकेल अशा गावांमध्ये प्राधान्याने गतिमान वैरण विकास कार्यक्रम राबवावा आणि तदनंतर इतर विभागातील जिल्ह्यांना/तालुक्यांना प्राधान्य द्यावे.

**इ.** सदर गतिमान वैरण विकास कार्यक्रमांतर्गत किमान ०.२ हेक्टर ते कमाल १ हेक्टर क्षेत्रावर चारा पिकाच्या लागवडीकरीता बियाणे व बीज प्रक्रियेकरीता रु. १५००/- प्रति हेक्टर प्रमाणे लाभार्थी शेतकऱ्यांना अनुदान देय राहील तसेच, लाभार्थी शेतकरी निवडतेवेळी पशुधन असणाऱ्या अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांना प्राधान्य देण्यात यावे.

**ई.** संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांकडे गतीमान वैरण विकास कार्यक्रमाकरीता निधी प्राप्त झाल्यानंतर तालुका कृषि अधिकाऱ्यांनी लाभार्थ्यांची निवड करुन बियाणे वाटपाचा कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका कृषि अधिकाऱ्यांच्या स्तरावर संकलित करण्यात यावी. सदर यादीमध्ये शेतकऱ्याचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक याच्यासह, मोबाईल / दुरध्वनी क्रमांक, बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. पैकी किमान एकाची माहिती संकलित करण्यात यावी. त्याचप्रमाणे गतीमान वैरण विकास कार्यक्रमांतर्गत निवडण्यात आलेल्या लाभार्थ्यांची यादी निधी प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांमध्ये कृषि विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांची राहील.

**उ.** सदर लाभार्थ्यांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतकऱ्यांनी चारा लागवड केल्याची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषि सहायकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषि अधिकाऱ्यांमार्फत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषि सहायकांचे अहवाल प्राप्त होताच सदर कार्यक्रमांतर्गत चारा लागवड झालेल्या क्षेत्रांपैकी निवडक क्षेत्रांची पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी मार्गदर्शक सूचनेमध्ये विहित करावे.

३. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत गतिमान वैरण विकास कार्यक्रम राबविण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत असलेला रु. २५ कोटी निधी सन २०१५- १६ या चालू वित्तीय वर्षात अखर्चित राहणार नाही याची अंमलबजावणी यंत्रणांनी काळजी घ्यावी. तसेच संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास वेळोवेळी सादर करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२२१७२४३२२९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2015.08.01 17:34:00 +05'30'

**( सु. सं. धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३. अ.मु.स. (कृषि), कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय,मुंबई.
४. सचिव,(पदुम),कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय,मुंबई.
५. सचिव (जलसंधारण),ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
६. सचिव,ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
७. सर्व विभागीय आयुक्त
८. आयुक्त,कृषि,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
९. आयुक्त,पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य,पुणे
१०.आयुक्त,दुग्धव्यवसाय,वरळी,मुंबई,महाराष्ट राज्य
११.सर्व जिल्हाधिकारी
१२.महालेखापाल, ( लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१ मुंबई
१३.महालेखापाल, ( लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२ नागपूर
१४.संचालक विस्तार व प्रशिक्षण तथा कृषि नोडल अधिकारी,कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे, (५ जादा प्रतीसह)
१५.सर्व संचालक / कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१७.सर्व जिल्हयांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१८. माहिती व जनसंपर्क संचालनालय (५ प्रतीसह) नियोजन / वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
१९.सर्व उप सचिव ( कृषि ),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
२०.कार्यासन राकृवियो/ कार्यासन २ अे, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
२१.निवड नस्ती (का.३ अे)

* * *

शासन निर्णय कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
क्रमांकः कृविका २०१५ /प्र.क्र.१९८/३-अे, दिनांक : ३१ जुलै , २०१५ सोबतची यादी :-

**Rainfall Recording & Analysis, Deptt. of Agriculture, Govt. of Maharashtra 31.07.2015**

**Intensity wise List of Tehsils as on 31 July 2015 (Progressive)**

| Range From 0% To 25 % | | | |
|---|---|---|---|
| Sr | District | Tehsil | Count |
| 1 | Solapur | S.solapur, Akkalkot, Mohol | 3 |
| 2 | Beed | Gevari, Shirur Kasar | 2 |
| 3 | Latur | Chakur, | 1 |
| 4 | Osmanabad | Osmanabad, Kalamb, | 2 |
| 5 | Nanded | Deglur, | 1 |
| 6 | Parabhani | Parabhani, Pathari, Jintur,Sonpeth, | 4 |
| 7 | Buldhana | Lonar, | 1 |
| 8 | Yavatmal | Yaotmal, Umerkhed | 2 |
| | | Total | 16 |

| Range From 25% To 50 % | | | |
|---|---|---|---|
| Sr | District | Tehsil | Count |
| 1 | Sindhudurg | Vaibhawadi, | 1 |
| 2 | Nasik | Nandgaon, Peth, Yevla, Chandwad, Devli | 5 |
| 3 | Jalgaon | Jalgaon, Yaval, Raver, Edlabad muktainagar, Amalner, Jam Pachora, Bodhwada, | 8 |
| 4 | Ahmed Nagar | Karjat, Jamkhed, Shegaon, Pathardi, Newasa, Rahuri, Sangamner, Kopargaon, Shrirampur, Rahata | 10 |
| 5 | Pune | Indapur | 1 |
| 6 | Solapur | N.solapur, Barshi, Madha, Pandhrpur, Sangola, Malshiras, Mangalwedha | 7 |
| 7 | Kolhapur | Hatkanangle, Radhanagri, Gadhinglaj, Chandgad, | 4 |
| 8 | Aurangabad | Paithan, Shvegaon, | 2 |
| 9 | Jalna | Jafrabad, Jalna, Ambad, Badnapur, Ghansangvi | 5 |
| 10 | Beed | Beed, Patoda, Ashti, Majalgaon, Ambejogai, Kej, Parali, Dharur, Vadavani | 9 |
| 11 | Latur | Latur, Ausa, Ahmedpur, Nilanga, Udgir, Renapur, Davani, Shirur Anantpal, Jalkot, | 9 |
| 12 | Osmanabad | Tuljapur, Paranda, Bhum, Umarga, Lohara, Washi, | 6 |
| 13 | Nanded | Biloli, Mukhed, Kandhar, Lohar, Hadgaon, Himayat Nagar, Dharmabad, Umari, Ardhapur, Naigaon Kh, | 10 |
| 14 | Parabhani | Gangakhed, Purna, Palam, Seloo, Manvat, | 5 |
| 15 | Hingoli | Kalmnuri, Basmat, Audha, | 3 |
| 16 | Buldhana | Jalgaon, Jamod, Sangrampur, Chikhali, Buldhana, Deulgaonraja ,Mehkar, Shindkhedraja, khamgaon, Shegaon, Nandura, | 10 |
| 17 | Akola | Akot, Telhara, Akola, | 3 |
| 18 | Washim | Malehgaon, Karanja, | 2 |
| 19 | Yavatmal | Bhabulgaon, Kalam, Darva, Digras, Ner, Mohagaon, Wani, Maregaon, Zarijamni, Kelapur, Ghatanji, Ralegaon | 12 |
| 20 | Chandrapur | Chimur, Bramhpuri, Nagbhid, | 3 |
| | | Total | 115 |